केंद्र व राज्य पुरस्कृत Scheme for Modernization and Reform through Technology in Public Distribution System-SMART-PDS या योजनेच्या अंमलबजावणीकरीता Single Nodal Agency (SNA) व नोडल अधिकारी यांची नियुक्ती करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२३/प्र.क.५०/सं.क.**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
तारीख :-११ मार्च, २०२४

**संदर्भ**:-

१) केंद्र शासनाच्या खाद्य व सार्वजनिक वितरण विभाग यांचे F.No.४(१)/२०२०-compcell (E-३७०९२६) दि.०४.०५.२०२३ रोजीचे पत्र.
२) केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालयाचे F.No.1(13)PFMS/FCD/2020, दि.२३.०३.२०२१ व १२.०४.२०२१
३) शासन निर्णय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग क्र.: संकीर्ण-२०२३/प्र.क्र./५०/सं.क. दि.२७.०२.२०२४.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.संकीर्ण-२०२१/प्र.क.३५/कोषा प्रशा-४, दि.०१.०७.२०२१.
५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.संकीर्ण-२०२१/प्र.क्र.८४/कोषा प्रशा-५ दि.१५.०९.२०२१.

**प्रस्तावना:-**

केंद्र शासनाने सन २०२३-२०२६ या ३ वर्षाच्या कालावधीकरीता Scheme for Modernization and Reform through Technology in Public Distribution System (SMART-PDS) या केंद्र व राज्य पुरस्कृत योजनेला व त्याकरीता येणाऱ्या रू.३४९.९ कोटी खर्चास संदर्भ क्र. ०१ येथील दि.०४.०५.२०२३ रोजीच्या पत्रान्वये मान्यता दिली आहे. सार्वजनिक वितरण व्यवस्थेंतर्गत End to End Computerisation व Integrated management of Public distribution system (ImPDS) योजनेंतर्गत राबविलेल्या तंत्रज्ञानातील सुधारणा टिकवून ठेवणे व भविष्यात सदर तंत्रज्ञानाचे अद्ययाविकरण करणे हा SMART-PDS योजनेचा उद्देश आहे. सदर योजनेच्या खर्चाकरीता केंद्र व राज्य हिस्सा ६०:४० असा आहे. केंद्र शासनाच्या खाद्य व सार्वजनिक वितरण विभागाशी Memorandum of Understanding (MoU) करण्यात आला आहे. तसेच संदर्भ क्र. २ येथील दि.२७.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये सन २०२३-२६ या कालावधीकरीता केंद्र शासनाच्या Scheme for Modernization and Reform through Technology in Public Distribution System (SMART-PDS) या योजनेची राज्यात अंमलबजावणी करण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

केंद्र पुरस्कृत योजनांचे निधी वितरण व विनियोग व्यवस्थापन (PFMS) याबाबत सुधारित कार्यपध्दतीनुसार प्रत्येक केंद्र पुरस्कृत योजनेच्या अंमलबजावणीसाठी संबंधित प्रशासकीय विभागाने एका Single Nodal Agency (SNA) ची नेमणूक करुन त्या योजनेसाठी प्राधिकृत बँकेत स्वतंत्र Single Nodal Bank Account उघडावे. तसेच त्यासोबतच योजनेच्या समन्वयाच्या दृष्टीने किमान उप सचिव दर्जाच्या अधिकाऱ्याची Nodal Officer म्हणून नियुक्ती करणेबाबत वित्त विभागाने संदर्भ क्र.०१.०७.२०२३ शासन परिपत्रकान्वये सूचना दिल्या आहेत. त्यानुषंगाने उक्त केंद्र सहाय्यीत योजनेच्या अंमलबजावणीसाठी व समन्वयासाठी Single Nodal Agency (SNA) आणि Nodal Officer यांची नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

केंद्र शासनाच्या संदर्भ क्र.३ व वित्त विभागाच्या संदर्भ क्र.०४ येथील शासन परिपत्रकान्वये दिलेल्या सूचनांनूसार अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या केंद्र पुरस्कृत योजनेच्या अंमलबजावणी व समन्वयासाठी पुढील प्रमाणे Single Nodal Agency आणि Nodal officer यांची नियुक्ती करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

Single Nodal Agency (SNA):-

| विभागाचे नाव | केंद्र पुरस्कृत योजनेचे नाव | Single Nodal Agency (SNA) |
|---|---|---|
| अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई | Scheme for Modernization and Reform through Technology in Public Distribution System-SMART-PDS- (केंद्र व राज्य ६०:४० हिस्सा) | वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई |

Nodal officer:-

| विभागाचे नाव | केंद्र पुरस्कृत योजनेचे नाव | Nodal Officer |
|---|---|---|
| अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई | Scheme for Modernization and Reform through Technology in Public Distribution System-SMART-PDS- (केंद्र व राज्य ६०:४० हिस्सा) | उपसचिव/सह सचिव (संगणक कक्ष) अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय मुंबई. |

२. सदर योजनेंतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त होणाऱ्या निधीसाठी Single Nodal Agency Account (SNA) स्वंतत्र बँक खाते उघडण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. Single Nodal Agency (SNA) यांनी उक्त केंद्र पुरस्कृत योजनेच्या निधी वितरण व विनियोग व्यवस्थापनाच्या दृष्टीने PFMS बाबत वित्त विभागाच्या संदर्भ क्र.४ येथील दि. १ जुलै, २०२१ परिपत्रकात व संदर्भ क्र. ०५ येथील दि.१५ सप्टेंबर, २०२१ च्या शासन निर्णयात नमूद सूचनांनुसार आवश्यक ती कार्यवाही करावी. तसेच, उक्त नमूद योजनेकरीता सिंगल नोडल एजन्सी खाते वित्तीय सल्लागार व उपसचिव यांच्या स्तरावर उघडणे व सदर खाते PFMS प्रणालीसोबत संलग्न करण्याच्या अनुषंगाने उचित कार्यवाही करावी.

४. सदर SNA खाते भविष्यात बंद करण्यात आल्यास, त्यामधील शिल्लक रकमेचा ताळमेळ घेऊन शिल्लक अखर्चित रक्कम योग्य त्या शासन लेखाशिर्षाखाली तात्काळ जमा करण्याची कार्यवाही वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालयाने करावी.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१११७०५३०८४०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

NETRA PRASHANT MANKAME

Digitally signed by NETRA PRASHANT MANKAME
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=19e4a6ac471ded0614da7ea31c20099ea471d8436dcf49faa3c0b2e0638732c3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C3DA775EEDF3E67170F45DF66F5DEAC516C0B0AB689DA4176D3BEBB60CCAD385, cn=NETRA PRASHANT MANKAME
Date: 2024.03.11 17:15:20 +05'30'

**( नेत्रा मानकामे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४) मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
५) मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव
६) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई
८) वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई
९) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता-१/२, मुंबई/नागपूर
१०) महालेखापाल, लेखापरिक्षा-१/२, मुंबई/नागपूर
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१२) प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक
१३) सर्व उपसचिव/अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई
१४) संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१५) निवडनस्ती (कार्यासन सं.क.)